(वितरण आदेश क्रमांक-१२)

सन २०१८-२०१९ या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी NRLP/NRLM करिता GEN प्रवर्गासाठी अर्थसहाय्य.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१८/प्र.क्र.८२/योजना-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ११ जानेवारी, २०१९

वाचा :- केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र.जे-१२०२५/०१/२०१८-आरएल (एनआरएलएम _४५ A), दिनांक ३१ डिसेंबर, २०१८ चे वितरण आदेश.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, NRLM सर्वसाधारण प्रवर्गा करिता दुसरा हप्ता म्हणून रु.५२६१.१२ लाख इतका निधी वितरीत केलेला आहे. राज्याच्या एकत्रित निधीमध्ये सदर निधी जमा झालेला आहे. त्यामुळे सदर केंद्र हिस्सा रु.५२६१.१२ लाख, व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.३५०७.४१ लाख असा एकूण रु.८७६८.५३ लाख इतका निधी वितरित करणे आवश्यक आहे. परंतू केंद्र हिस्सा व राज्य हिश्याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून केंद्र हिस्सा रु. ४६७३.५२ लाख व राज्य हिस्सा रु.३११५.६८ लाख इतका निधी शिल्लक आहे. सबब केंद्र हिस्सा रु.४६७३.५२ लाख व राज्य हिस्सा रु.३११५.६८ असा एकूण रु.७७८९.२० लाख इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१८-२०१९ मध्ये NRLM सर्वसाधारण प्रवर्ग केंद्र हिस्सा (२५०१ २९०८) करिता केलेल्या तरतूदीतून रु.४६७३.५२ लाख (रुपये शेहेचाळीस कोटी त्र्याहत्तर लाख बावन हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सन २०१८-१९ मध्ये केंद्र समरुप राज्य हिस्सा (२५०१ २७७५) करिता केलेल्या तरतूदीतून रु.३११५.६८ लाख (रुपये एकतीस कोटी पंधरा लाख अडूसष्ठ हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

४. सदर रक्कम रु.४६७३.५२ लाखाचा खर्च "मागणी क्र.एल - ३, २५०१ ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (१३)महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला अनुसूचित जाती / जमाती व्यतिरिक्त लाभार्थ्यांना अर्थसहाय्य (केंद्र हिस्सा) (सर्वसाधारण) (७५%), (२५०१ २९०८) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली व रु.३११५.६८ लाखाचा खर्च "मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना,(०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार , (०५) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला अनुसूचित जाती / जमाती व्यतिरिक्त

लाभार्थ्यांना अर्थसहाय्य, ३३ अर्थसहाय्य, (२५०१ २७७५)" या लेखाशिर्षाखाली सन २०१८-२०१९ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

५. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणा-या अधिका-यांनी नोंद घ्यावी.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग, यांचे कडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक. ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

७. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग शासन परिपत्रक्र दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या तपासणी सूचीतील प्रत्येक अटींची पूर्तता झालेली आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६/अर्थोपाय, दिनांक ८ जानेवारी, २०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११११४५६०९८२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anil Madhao Kale

Digitally signed by Anil Madhao Kale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e29bfbc8f31dc2b43b5ba876864f627ec1dc888a2c6faead66c26cb1a5c2f137, cn=Anil Madhao Kale
Date: 2019.01.11 15:05:37 +05'30'

**(अनिल काळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड),सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) नियोजन विभाग (का.१४१४) मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवडनस्ती.